(223) 20150423115858 7027

जामडी लघु पाटबंधारे योजना ता.चाळीसगाव,
जि. जळगाव प्रथम सुधारित प्रशासकीय
मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- लपायो २००८/६०५/(२२३/२००८) खारभूमी
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- २८/०८/२००८.

पहावे :- १) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांचे पत्र क्रमांक कासं/तापाविमं/प्रशा-६/९५६/सन २००८, दिनांक १९/४/२००८.

**प्रस्तावना :-**

जामडी लघु पाटबंधारे योजना ता. चाळीसगाव, जि. जळगाव या योजनेस तापी पाटबंधारे विकास महामंडळ, निर्णय क्रमांक-तापाविम/क.अ./प्रवि-१/२८-९९/प्रमा-२४, दि.१२.१०.९८ अन्वये रूपये २६५.८४ लक्ष इतक्या रकमेस मूळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. सदर योजनेचे काम सन ९८-९९ मध्ये सुरू करण्यात आले असून सद्यःस्थितीत मुख्य धरण, सांडवा, प्रवेश मार्ग व पुच्छ मार्ग मुख्य विमोचक भरणा कालवा याची कामे पूर्ण झालेली असून मुख्य कालवा, वितरिका, पोहच रस्ता व इतर काही कामे बाकी आहेत. या कामासाठी सन २००७-०८ च्या दरसूचीवर आधारित रुपये ६११.६४ लक्ष किंमतीचा प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता मिळण्याचा प्रस्ताव कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांच्याकडून शासनास प्राप्त झाला व तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

आता या शासन निर्णयान्वये जामडी लघु पाटबंधारे योजना ता. चाळीसगाव, जि. जळगाव या योजनेस सन २००७-२००८ वर्षाच्या दरसुचीवर आधारित सुधारित केलेल्या प्राक्कलनानुसार कामाच्या एकूण अंदाजित रूपये ६,११,९४,२५६/- (रूपये सहा कोटी, अकरा लक्ष, चौऱ्याण्णव हजार, दोनशे छपन्न फक्त) यापैकी कामाप्रित्यर्थ रूपये ५,२५,३४,२८७/- व रूपये ८६,५९,९६९/- अनुषंगिक खर्च या रक्कमेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. उपशिर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशिर्ष "४७०२ लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च ८००-इतर खर्च (५) बांधकामे लघु पाटबंधारे योजना पंचवार्षिक योजनांतर्गत योजना" यादर खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय क्रमांक संकिर्ण १०९९/(१२९/९९) मोप्र (प्र) दिनांक १८/५/१९९९ मधील तरतूदीनुसार आतंर वित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकीय मान्यता (२२/२००८) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(रा.च.हुमणे)
शासनाचे अवर सचिव

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई/नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा) मुंबई / नागपूर
वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (१४६१), मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
आतंर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव (लपा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, जळगाव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगाव
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, जळगाव
अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप अभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अर्थ शाखा १ /२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
लपा-१ (२ प्रती) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, जळगांव
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालक, मंत्रालय, मुंबई (२ प्रती)
संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई
खारभूमी कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक लपायो २००८/६०५/(२२३/२००८) खारभूमी दिनांक २८/०८/२००८ चे परिशिष्ट
जामडी लघु पाटबंधारे योजना ता. चाळीसगाव, जि. जळगाव अंदाजपत्रकाचा गोषवारा

| क्रमांक | शिर्ष / उपशिर्ष | शिर्ष कामे | मुख्य व शाखा कालवा | एकूण रुपयात |
|---|---|---|---|---|
| १ | "ए" प्राथमिक | १८७८९२ | १५२४३६ | ३४०३२८ |
| २ | "ब" (भूसंपादने) | ११७३८०२०५ | २७८०३६६ | २०१६०५७१ |
| ३ | "सी" मुख्य कामे | २०२२०१६८ | -- | २०२२०१६८ |
| ४ | "डी" विमोचक | ९९७६७५ | ३५९८४० | १३५७५१५ |
| ५ | "ई" फॉल | -- | १२२५९०४ | १२२५९०४ |
| ६ | "एफ" आरपारचटी वर्क्स | -- | २८०४५९६ | २८०४५९६ |
| ७ | "जी" पूल (सीटी क्रॉसींग) | -- | ५३०९५० | ५३०९५० |
| ८ | "एच" एस्कोप | -- | -- | -- |
| ९ | "के" इमारती | ४१०२८६ | -- | ४१०२८६ |
| १० | "एल" मातीकाम | -- | २२४८२७० | २२४८२७० |
| ११ | "एम" वृक्षारोपन | ३५३३०० | -- | ३५३३०० |
| १२ | "ओ" संकिर्ण | ३१८२६८ | १०००० | ३२८२६८ |
| १३ | "पी" देखभाल | ५३०४५ | ३५८६८ | ८८९१३ |
| १४ | "आर" दळणवळण | २१०७८१८ | -- | २१०७८१८ |
| १५ | वितरिका | -- | ३५७४०० | ३५७४०० |
| | कामाप्रित्यर्थ किंमत | ४२०२८६५७ | १०५०५६३० | ५२५३४२८७ |
| | अनुषंगिक खर्च (२६.७५ टक्के भूसंपादन खर्च वगळून) | | | ८६५९९६९ |
| | योजनेची एकूण किंमत | | | ६११९४२५६ |

**ठळक वैशिष्टये**

| | |
|---|---|
| योजनेची सिंचन क्षमता | २५८ हेक्टर |
| नियोजित पाणीसाठा | २४९४.७७ सघमी |
| पाणीसाठयाची प्र.स.घ.मी. किंमत (रु) | २४५२९ < मापदंड २८१७४/ |
| लाभव्यय गुणोत्तर | १.९५ > मापदंड १.०० |

F:\Maahegoen-order-HHP..doc